**बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या आस्थापनेवर ३००० मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून (महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ) घेण्यास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक मरासू-०५२३/प्र.क्र.१६०/विशा-४**

मंत्रालय मुख्य इमारत, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २८ मार्च,२०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय क्रमांक:एमआयएस-४२१/प्र.क्र.१६०/विशा-४ दिनांक २४ जुलै,२०२३
२) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.OW.CP/D-९(१०)/admin/sankirn/१६६/२०२४/दिनांक ०१/१०/२०२४ रोजीचे पत्र.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.जा.क्र.२२६५/पोआ/कक्ष-९(८)/२०२४ दि.१७/१२/२०२४
४) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.जा.क्र.२२६५/पोआ/कक्ष-९(१२)/२०२५ दि.१७/०३/२०२५

**प्रस्तावना:-**

बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या आस्थापनेवर पोलीस शिपाई ते सहायक पोलीस उपनिरीक्षक यांची ४०६२३ पदे मंजूर आहेत. त्यापैकी पोलीस शिपाई संवर्गाची सुमारे १०००० पदे रिक्त असून, मुंबई पोलीस आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवरील उपलब्ध मनुष्यबळ सर्व प्रकारच्या दैनंदिन कर्तव्यांकरिता अपुरे पडत आहे. शासन निर्णय दि. २१ जानेवारी २०२१ अन्वये बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयासाठी ७०७६ पोलीस शिपाई संवर्गातील व पोलीस चालक संवर्गातील ९९४ पदे भरण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. प्रत्यक्षात भरती प्रक्रिया सुरू असलेली ७०७६ पदे वगळल्यानंतरही सुमारे ३००० पदे रिक्त राहत आहेत.तसेच सदर अंमलदार भरती प्रक्रिया व प्रशिक्षण पूर्ण होऊन प्रत्यक्ष कर्तव्यासाठी २ वर्षांनंतर आयुक्तालयास उपलब्ध होणार आहेत.

बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयातील पोलिस शिपाई पदे विहीत मार्गाने भरण्याची कार्यवाही पूर्ण होईपर्यत किमान ११ महिने कालावधीसाठी एकूण ३००० मनुष्यबळाच्या सेवा महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळाकडून उपलब्ध करुन देण्याची विनंती पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी शासनाकडे केली होती. या विनंतीस अनुसरुन बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालया अंतर्गत पोलीस शिपाई पदे विहित मार्गाने भरण्याची कार्यवाही पुर्ण होईपर्यत किमान ११ महिन्यांकरिता एकूण ३००० मनुष्यबळाच्या सेवा महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळाकडून घेण्यास शासन निर्णय दिनांक २४ जुलै,२०२३ अन्वये मान्यता देण्यात आलेली होती. तथापि, बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालया अंतर्गत प्रत्यक्षात भरती सुरु असलेली पदे भरती प्रक्रिया व प्रशिक्षण पूर्ण होऊन प्रत्यक्ष कर्तव्यसाठी दोन वर्षानी आयुक्तालयास उपलब्ध होणार असल्याने बृहन्मुंबई पोलीस आयुक्त कार्यालयास एकूण ३००० मनुष्यबळाच्या सेवा महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळाकडून पुढील किमान ११

महिन्यांकरिता मुदतवाढ देण्यास विनंती करण्यात आलेली आहे. सबब, ३००० मनुष्यबळाच्या सेवा घेण्यास पुढील ११ महिन्यांची मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

१. महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळाकडून एकूण ३००० मनुष्यबळाच्या सेवा दिनांक २१/११/२०२४ पासून ११ महिन्यांकरीता घेण्याबाबत अथवा बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालया अंतर्गत पोलीस शिपाई यांची भरती प्रक्रीया यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यत अंतिम मुदतवाढीस मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई व महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ यांनी करावी. तसेच पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी त्यांच्या आस्थापनेवरील मंजुर मनुष्यबळाची रिक्त पदे भरती करण्यासंदर्भात आवश्यक कार्यवाही करावी.

२. सदरचा खर्च मागणी क्र.बी-१ (२०५५००९७),१०-कंत्राटी सेवा या लेखाशिर्षातुन करण्यात यावा. याकरिता पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तसेच त्यांच्या अधिनस्त वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाकडील अनौ.संदर्भ क्र.१२१/२०२५/आपुक,दि.२५/००३/२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२५०३२८१९३५१४६३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकिंत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.03.28 19:36:05 +05'30'

**( चेतन निकम )**
**उप सचिव, गृह विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई
३) पोलीस महासंचालक तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ,मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई
५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
६) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
७) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) वित्त विभाग कार्यासन (व्यय-७),वित्तिय सुधारणा ,(आपुक) मंत्रालय,मुंबई
९) गृह विभाग, कार्यासन,पोल-५ अ,पोल-५ ब, पोल-३, मंत्रालय,मुंबई
१०) निवडनस्ती विशा/४